**आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदीच्या**
**<u>प्रस्तावांबाबत करावयाची कार्यवाही</u>.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/२०/कोषा.प्रशा.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३० जानेवारी, २०२०.

**संदर्भ** : शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण २०१९/प्र.क्र.1/१९/कोषा. प्रशा-५,दि.३१.१.२०१९

## शासन परिपत्रक

अर्थसंकल्प वितरण प्रणाली सुरु करण्यामागे विभागाने दरमहा त्यांना उपलब्ध असलेल्या निधींचे नियोजन करुन खर्च करणे अपेक्षित आहे. मात्र विभागांद्वारे अर्थसंकल्पीय वर्षाच्या शेवटच्या ३ महिन्यांमध्ये मोठया प्रमाणावर खर्च होत असल्याचे, शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे अनावश्यक अथवा प्राधान्यक्रम नसणाऱ्या बाबींवरील खर्च निर्धारीत व नियमित करण्याच्या दृष्टीने करावयाची उपाययोजना म्हणून शासन असा निर्णय घेत आहे की, सर्व प्रशासकीय विभागांनी व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात दि.१ फेब्रुवारी, २०२० तसेच त्यानंतर कोणत्याही खरेदीच्या प्रस्तावांना मंजूरी देऊ नये. तसेच विद्यमान फर्निचरची दुरुस्ती, झेरॉक्स मशीन, संगणक, उपकरणे अथवा त्यांचे सुटे भाग यांच्या दुरुस्तीचे प्रस्ताव, नैमित्तिक कार्यशाळा, सेमिनार व भाडयाने कार्यालय घेण्याचे प्रस्ताव इ. बाबींचे प्रस्ताव अशा प्रकारच्या प्रस्तावांना मंजूरी देऊ नये. तसेच अशा प्रकारच्या खरेदीचे प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करु नयेत.

२. उपलब्ध निधीच्या मर्यादेमधील औषध खरेदीची बाब यास अपवाद राहील. केंद्रीय योजना व त्यास अनुरुप राज्य हिस्सा तसेच बाहय सहाय्यित प्रकल्पांसाठी खरेदीच्या प्रस्तावांनादेखील सदर निर्बंध लागू होणार नाहीत.

३. जिल्हा वार्षिक योजना तसेच लोकप्रतिनिधी यांच्या स्थानिक विकास निधीमधून खरेदीबाबतचे प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करता येतील. मात्र प्रकरणपरत्वे निर्णय घेण्याचे अधिकार वित्त विभागाचे राहतील.

४. दिनांक १ फेब्रुवारी २०२० नंतर कोणत्याही खरेदीच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देता येणार नाही, अथवा प्रशासकीय मान्यता प्राप्त असेल, तरीही निविदा प्रसिध्द करता येणार नाही. मात्र दिनांक १ फेब्रुवारी २०२० पूर्वी निविदा प्रसिध्द झालेल्या प्रकरणात पुढील सर्व प्रक्रिया पूर्ण करता येतील.

५. चालू आर्थिक वर्षात कार्यालयाच्या दैनंदिन वापरातील उपभोग्य वस्तुंच्या मर्यादीत खरेदीकरीता, सदर निर्बंध लागू राहणार नाहीत. तथापि पुढील वर्षात आवश्यक असणाऱ्या वस्तुंची आगाऊ खरेदी करुन ठेवता येणार नाही.

६.  सदर आदेश हे चालू आर्थिक वर्षाकरीता असून दि. १ फेब्रुवारी, २०२० ते दि.३१ मार्च,२०२० पर्यंत लागू राहतील.

७.  सदर आदेश सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालये,शासकीय महामंडळे,अनुदानित संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था (नागरी/ ग्रामीण) इत्यादींबाबत शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून करावयाच्या खरेदीकरीता लागू राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००१३०१४५७१३०६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.01.30 14:40:06 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव.
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. संचालक,स्थानिक निधी लेखा परिक्षा,कोकण भवन, नवी मुंबई,
२९. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा मुंबई / पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती कोषा प्र.५